अनुसूचित जातीच्या मुलामुलींना शिक्षणासाठी परदेशी शिष्यवृत्ती योजनेत सुधारणा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः इबीसी -२०१४/प्र.क्र.८२/ शिक्षण-१**
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२
तारीख: १२ सप्टेंबर, २०१४

१) वाचा - शासन निर्णय सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः इबीसी २००३/प्र.क्र.११५/मावक - २, दिनांक ११.६.२००३
२) शासन निर्णय सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः इबीसी २००४/प्र.क्र.१०२/मावक - २, दिनांक ५.८.२००४
३) शासन निर्णय सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः इबीसी २००६/प्र.क्र.३२९/मावक - २, दिनांक १७.६.२००६
४) शासन निर्णय सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः इबीसी २०१०/प्र.क्र.१९४/मावक-२ दिनांक १५.७.२०१०
५) शासन निर्णय सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः इबीसी २०१०/प्र.क्र.१९४/मावक-२ दिनांक २२.१०.२०१०
६) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः इबीसी २०१३/प्र.क्र.११/शिक्षण-१ दिनांक १०.१.२०१३
७) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः इबीसी २०१३/प्र.क्र.१४१/शिक्षण-१ दिनांक ८.८.२०१३
८) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः इबीसी २०१३/प्र.क्र.१४१/शिक्षण-१ दिनांक २८.११.२०१३
९) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्रमांक सकआ/शिक्षण/परदेश निवड समिती इतिवृत्त/२०१४-१५/का-४/१४३० दिनांक १०.६.२०१४

**प्रस्तावना -**

उपरोक्त शासन निर्णय दिनांक ११.०६.२००३ व दिनांक ०५.०८.२००४ अन्वये अनुसूचित जातीच्या विद्यार्थ्यांना परदेशात नामांकित शिक्षण संस्थेत शिक्षणाची संधी मिळावी याकरीता परदेशी शिष्यवृत्ती योजना लागु करण्यात आली आहे. तसेच या योजनेच्या नियमावलीत वेळावेळी सुधारणा करण्यात आली आहे. सदर नियमावलीतील काही बाबींमध्ये सुधारणा करण्याचा प्रस्ताव आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांनी उपरोक्त दिनांक १०.६.२०१४ च्या पत्राद्वारे सादर केला होता. त्यानुसार नियमावलीत सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय**

अनुसूचित जातीच्या विद्यार्थ्यांसाठीच्या परदेशी शिष्यवृत्ती योजनेच्या नियमावलीत पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे:-

**अ) निवडीची कार्यपध्दती व कालमर्यादा**

१) प्रतिवर्षी परदेशी शिष्यवृत्ती योजनेची जाहिरात २ मे रोजी देण्यात यावी व ऑनलाईन अर्ज स्विकारण्याची मुदत २० जुलै अशी राहील.

२) निवड समिती बैठक जुलै महिन्याच्या अखेरीस घेऊन निवड झालेल्या विद्यार्थ्यांचा शासन निर्णय दिनांक १४ ऑगस्ट पर्यंत प्रतिवर्षी निर्गमित करील. जेणेकरुन सप्टेंबरपासून सुरु होणाऱ्या अभ्यासक्रमास हजर राहणे विद्यार्थ्यांना शक्य होईल.

३) आयुक्त, समाज कल्याण हे प्रतिवर्षी सप्टेंबर महिन्याच्या अखेरीपर्यंत संबंधित विद्यापीठांचे वित्त विभागाकडून खर्चाची माहिती विहित प्रपत्रात मागवतील.

ब ) **<u>पात्रतेच्या अटी व शर्ती:-</u>**

१) एका कुटुंबातील एकापेक्षा जास्त व्यक्तींना लाभ घेता येईल मात्र ज्या उमेदवाराच्या कुटुंबातील अन्य सदस्यास यापूर्वी या योजनेचा लाभ झाला असेल त्या उमेदवाराचा शेवटी विचार करण्यात यावा. जेणेकरुन त्या उमेदवाराच्या घरातील कोणास या पूर्वी लाभ झाला नसेल त्या उमेदवारास प्राधान्य मिळेल.

२) ज्या परदेशी विद्यापीठांचे जागतिक रेटींग **५००** पर्यंत आहे, अशाच विद्यापीठात प्रवेश मिळालेले विद्यार्थी या योजनेसाठी पात्र राहतील. (जाहिरातीच्या वेळी असणारे विद्यापीठाचे रेटिंग गृहीत धरण्यात यावे.) मात्र निवड ही मेरीटनुसारच होईल.

३) विद्यार्थ्याने विहित मुदतीत ऑनलाईन अर्ज भरणे बंधनकारक आहे. अर्जासोबत जी कागदपत्रे जोडावयाची आहेत ती स्कॅन करुन अर्जास जोडण्याची सुविधा उपलब्ध करुन द्यावी. अर्ज व्यवस्थीत भरला व आवश्यक ती कागदपत्रे जोडली गेली तरच अर्ज स्विकृत होईल अशी व्यवस्था सॉफ्टवेअरमध्ये करावी यावी. जे अर्ज ऑनलाईन स्वीकृत होतील त्यांचीच नावे निवड समिती विचारात घेईल.

४) निवड समितीने शिफारस केलेल्या विद्यार्थ्यांची गृह चौकशी संबंधित जिल्हयातील सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण यांच्या मार्फत करण्यात येईल. गृह चौकशीमध्ये पात्र ठरलेल्या विद्यार्थ्याने सादरीकरण (Presentation) करणे आवश्यक राहील आणि निवड ही मेरीट नुसारच होईल.

५ ) **<u>शैक्षणिक पात्रता :-</u>**

(१) **पी एच डी** -पदव्युत्तर पदवी प्रथम प्रयत्नात किमान ५५ टक्के गुणाने उत्तीर्ण असणे आवश्यक आहे.

(२) **पदव्युत्तर पदवी** - पदवी परीक्षा प्रथम प्रयत्नात किमान ६० टक्के गुणाने उत्तीर्ण आवश्यक आहे.

६) एकदा शिष्यवृत्ती मंजूरी झाल्यानंतर विद्यार्थ्यास विद्यापीठात व अभ्यासक्रमात बदल करता येणार नाही. मात्र तांत्रिक कारणास्तव पुढील सेमिस्टरमध्ये त्याच विद्यापीठात व त्याच अभ्यासक्रमास ( फक्त एकदाच ) शासन मान्यतेने प्रवेश घेण्यास मान्यता देता येईल. तद्‌नंतर विद्यार्थ्यांने परदेशी शिष्यवृत्ती मंजूरीसाठी नव्याने ऑनलाईन अर्ज भरणे आवश्यक राहील.

७) विद्यार्थ्याने कोणत्या दिनांकास व कोणत्या विमानाने परदेशात जाणार आहे याची माहिती आयुक्तालयास दिल्याशिवाय त्याला परदेशात जाता येणार नाही. तो ही माहिती न देता परदेशात गेल्यास त्याला विमान प्रवासाचा खर्च मिळणार नाही.

८) विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक प्रगती व उपस्थितीच्या अनुषंगाने भारत सरकारच्या सामाजिक न्याय मंत्रालयामार्फत परदेशातील भारतीय दूतवासाकडून अहवाल प्राप्त करण्याचा प्रयत्न करण्यात यावा.

९) अभ्यासक्रम संपल्यावर संबंधित विद्यार्थ्याने त्वरीत भारतात येऊन त्याचे अंतिम परीक्षेचे गुणपत्रक व प्रमाणपत्र आयुक्त, समाज कल्याण यांना सादर करणे आवश्यक राहील. विद्यार्थ्याने अगोदरच्या वर्षाचे गुणपत्रक दिल्यानंतरच पुढील वर्षाची शिष्यवृत्ती आयुक्तांनी मंजूर करावी. मात्र याबाबत विद्यार्थ्यास तशी पूर्वसूचना देणे आवश्यक राहील.

१०) अभ्यासक्रमाचा कालावधी संपल्यावर परदेशातील वास्तव्यासाठी कोणताही पत्रव्यवहार आयुक्तालयामार्फत केला जाणार नाही अथवा त्यासाठी कोणताही जादा निधी मंजूर केला जाणार नाही.

२. उपरोक्त सुधारणा व्यतिरिक्त उर्वरित नियम, अटी व शर्ती पूर्वीप्रमाणेच राहतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१२१५३६४१०७२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pratap Pandurang Lubal

Digitally signed by Pratap Pandurang Lubal
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pratap Pandurang Lubal
Date: 2014.09.17 11:47:56 +05'30'

**(प्र.पां.लुबाळ)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
३) मा. मंत्री/मा.राज्यमंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव
४) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय मुंबई.
६) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय मुंबई.
७) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
८) सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधीद्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
९) सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११) संचालक, वैद्यकीय शिक्षण संचालनालय, मुंबई
१२) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई
१३) सह सचिव (शिक्षण-१), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) अवर सचिव (शिक्षण-१), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) शिक्षण -१ (निवडनस्ती)